**ॲड. वैभव बगाडे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

**पश्चिम विभाग सायबर पोलीस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र.०१/२०२२ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी मा. महानगर न्यायदंडाधिकारी, १२ वे न्यायालय, वांद्रे, मुंबई, मा.सत्र न्यायालय, मुंबई आणि मा. उच्च न्यायालय, मुंबई मधील न्यायालयीन कामकाजासाठी.**

महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-०२२२/प्र.क्र.३२/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक: ५ मे,२०२२

संदर्भ :- (१) विधि व न्याय विभाग, एसपीपी क्र.२०२२/यु.ओ.आर. १९/डी-१४, दि.०२.०३.२०२२

(२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. २९.०७.२०१५.

(३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम,दि. १६.०६.२०१७.

**शासन निर्णय:-**

पश्चिम विभाग सायबर पोलीस स्टेशन, मुंबई येथील गु.र.क्र.०१/२०२२ या गुन्ह्यामधून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणी मा. महानगर न्यायदंडाधिकारी, १२ वे न्यायालय, वांद्रे, मुंबई, मा.सत्र न्यायालय, मुंबई आणि मा. उच्च न्यायालय, मुंबई या मध्ये शासनाच्या वतीने बाजू मांडण्यासाठी संदर्भ क्र.१ अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त ॲड. वैभव बगाडे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी----- रू.२५,००० (रूपये पंचवीस हजार फक्त)**

**विचारविनिमय फी / प्रति बैठक.....रु.५,०००/- (रुपये पाच हजार फक्त)**

सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. वैभव बगाडे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधित प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करून घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा" या लेखाशिर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भ क्र. २ व ३ वरील वित्त विभाग शासन निर्णयानुसार मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात न्यायालयीन प्रकरणी नेमण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांना फी अदा करण्यासंदर्भात प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या अनौ.स.क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०५१६२८००१०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD65FF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA914814734600D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2022.05.05 16:29:03 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस सह आयुक्त (का. व सु.), मुंबई.
३) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, सायबर पोलीस ठाणे, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
५) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) ॲड. वैभव बगाडे, चेंबर क्र.८, दुसरा मजला, केरळ रेसिडेंसीच्या वर, जन्म भूमी मार्ग, मुंबई - ४०० ००१.
८) कार्यासन अधिकारी (का-१४)/अ' शाखा, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (पोल-१०)